**प्रधानमंत्री पीक विमा योजना रब्बी हंगाम सन २०१७-१८ साठी राज्य शासनाच्या हिश्याची पिक विमा हप्ता अनुदानापोटी रु. ८३,०३,८९,७९६ /- इतकी रक्कम भारतीय कृषि विमा कंपनीस वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१६५/११ अे,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०४ ऑक्टोबर, २०१८

वाचा -

१. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१६५/११-अे, दि.१७.११.२०१७
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१२४/११-अे, दि.०८.१२.२०१७
४. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१६५/११-अे, दि.२२.०३.२०१८
५. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र. सां ८ / वि.ह. अनु./५०८/२०१८, दि.१५.०९.२०१८

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना रब्बी हंगाम २०१७-१८ मध्ये नॅशनल इंशुरन्स कंपनी व ओरिएंटल इन्शुरन्स कंपनी या २ विमा कंपनींमार्फत राज्यात राबविण्यात आलेली आहे. प्रधानमंत्री पिक विमा योजना रब्बी २०१७-१८ अंतर्गत उपरोक्त २ कंपन्यांनी एकत्रित मिळून पिक विमा हप्ता अनुदानापोटी राज्य शासन हिस्सा रक्कम रु.९२,१३,८९,७९६/- ची मागणी केलेली असुन सदर रकमेपैकी ९,१०,००,००० इतकी रक्कम यापूर्वीच दि.२२.०३.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेली आहे. आता उर्वरीत असलेली रु.८३,०३,८९,७९६ इतकी रक्कम त्यांना उपलब्ध करुन देण्यासाठी भारतीय कृषि विमा कंपनीस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय :-**

रब्बी हंगाम सन २०१७-१८ मधील नियुक्त नॅशनल इंशुरन्स कंपनी व ओरिएंटल इन्शुरन्स कंपनी या २ विमा कंपन्यांनी पिक विमा हप्ता राज्य हिस्सा मागणी केलेल्या व वितरीत करावयाच्या अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे:-

| अनु. क्र. | विमा कंपनी | एकुण पीक विमा हप्ता राज्य हिस्सा अनुदान मागणी रु. | यापूर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान रु. | मागणी केलेले उर्वरीत अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | नॅशनल इंन्शुरन्स कं.लि. | ८९४०,२०,६१६,.०० | ९,००,००,०००.०० | ८०,४०,२०,६१६ |
| २ | ओरिएंटल इन्शुरन्स कं. लि. | २,७३,६९,१८० | १०,००,०००.०० | २,६३,६९,१८० |
| **एकुण** | | ९२,१३,८९,७९६ | ९,१०,००,०००.०० | ८३,०३,८९,७९६ |

प्रधानमंत्री पिक विमा योजना रब्बी २०१७-१८ अंतर्गत उपरोक्त २ कंपन्यांनी एकत्रित मिळून पिक विमा हप्ता अनुदानापोटी राज्य शासन हिस्सा रक्कम रु.९२,१३,८९,७९६/- ची मागणी केलेली असुन सदर रकमेपैकी ९,१०,००,००० इतकी रक्कम यापूर्वीच दि.२२.०३.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेली आहे. आता उर्वरीत असलेली रु.८३,०३,८९,७९६ इतकी रक्कम कृषि आयुक्तालयाने केलेल्या विनंतीनुसार त्यांना उपलब्ध करुन देण्यासाठी भारतीय कृषि विमा कंपनीस वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन, ३३ - अर्थसहाय्य**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००४१२२५५३१२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2018.10.04 12:30:12 +05'30'

**( प्रकाश कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२

२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई- ३२
१२. उप सचिव (११-अे/२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३
१५. निवड नस्ती (कार्यासन ११-अे).